सन २०१७, २०१८ व २०१९ या वर्षातील विविध कृषि पुरस्कार विजेते शेतकऱ्यांचा सत्कार करण्याकरिता उर्वरित रु.२०९.५१ लाख निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**कृषि पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- पुरस्कार -२०२१/प्र.क्र.११६/४-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२

दिनांक : १९ एप्रिल, २०२२

संदर्भ:-

१) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. कृभूपु-२०१७/प्र.क्र.६२/११-अे, दि.०२/०२/२०१९
२) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. पुरस्कार-२९१९/प्र.क्र.७०/४-अे, दि.२०/०९/२०१९
३) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. पुरस्कार-१०२०/प्र.क्र.२९/४-अे, दि.३१/०३/२०२१
४) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. पुरस्कार-२०२१/प्र.क्र.६५/११-अे, दि.२०/०९/२०२१
५) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.कृमावि/विप्र-४/पुरक मागणी/४२४९४/२०२१, दि.२२/१२/२०२१
६) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.कृमावि/विप्र-४/निधी वि./१०५९२/२०२२, दि.१७/०३/२०२२
७) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. पुरस्कार-२०२१/प्र.क्र.११६/४-अे, दि.०८/०४/२०२२

**प्रस्तावना :-**

राज्यातील कृषि, कृषि संलग्न क्षेत्र तसेच फलोत्पादन क्षेत्रामध्ये उल्लेखनीय कार्य करणाऱ्या शेतकरी व संस्था यांना दरवर्षी विविध कृषि पुरस्कार देवून त्यांचा गौरव करण्यात येतो. सन २०१७, २०१८ व २०१९ या वर्षाच्या विविध कृषि पुरस्काराच्या वितरणाचा कार्यक्रम लवकरच आयोजित करण्याचे नियोजन असून त्याकरिता रु.२५०.७० लाख निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती कृषि आयुक्तालयाने संदर्भांकित पत्रान्वये केली होती. त्यानुसार या विभागाच्या संदर्भ क्र.७ येथील दि.०८.०४.२०२२ च्या शासन निर्णयान्वये रु.४१.१९ लाख निधी आयुक्त (कृषि) यांना उपलब्ध करुन दिला असून, रु.२०९.५१ लाख निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती,त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

१. सन २०१७, २०१८ व २०१९ या वर्षातील विविध कृषि पुरस्कार विजेते शेतक-यांचा सत्कार करण्याकरिता रु.२०९.५१ लाख निधी (रुपये दोन कोटी नऊ लाख एक्कावन हजार फक्त) आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये खालील लेखाशिर्षाखाली वितरीत केलेला रु.२०९.५१ लाख निधी सन २०२२-२३ करिता मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून खर्ची टाकावा:-

मागणी क्र.डी-३
२४०१-पीक संवर्धन
१०९-विस्तार व शेतकरी प्रशिक्षण
०१-माहिती व प्रसार
(०१) (०३) पीक स्पर्धा (कार्यक्रम),
(२४०१ ०७५३) ५०, इतर खर्च

३. या शासन निर्णयान्वये वितरीत रु.२०९.५१ लाख निधीचे कोषागारातून आहरण व वितरण करण्यासाठी पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

| अ. क्र. | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण आधिकारी |
|---|---|---|---|
| १ | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषी आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे. |
| २ | विभाग स्तर | विभागीय कृषि सहसंचालक, ठाणे | लेखाधिकारी, विभागीय कृषि सहसंचालक कार्यालय, ठाणे |
| ३ | जिल्हास्तर | जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, नाशिक | लेखाधिकारी, जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी कार्यालय, नाशिक |

४. प्रस्तुत शासन निर्णय नियोजन विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१४६/२२/व्यय-१, दि.१३/०४/२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०४१९१७४६१०२८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by MAHENDRA SOPAN GHADGE
Date: 2022.04.19 17:47:07 +05'30'

**(महेंद्र घाडगे)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति -**

१. मा. मंत्री (कृषि)यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्य मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा.विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषी आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
११. विभागीय कृषी सहसंचालक, ठाणे व नाशिक
१२. जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी, नाशिक
१३. महालेखाकार ( स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई.
१४. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१६. जिल्हा कोषागार अधिकारी पुणे, ठाणे व नाशिक
१७. सहायक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, पुणे
१८. वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई
१९. निवड नस्ती-४अे